**राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेचा सन २०२२-२३ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३)**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२२/प्र.क्र.२१३/फ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ४.०४.२०२२.
२. प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.०८/१७२/२०२२-२३, दिनांक ४.०७.२०२२.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास), यांचेपत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र / प्र.क्र.०८/४९४/२०२२-२३, दि. २.१२.२०२२.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास), नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.०८/५२८/२०२२-२३, दि. १५.१२.२०२२.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक १३.०१.२०२३, दिनांक १.०२.२०२३ व दिनांक १०.०२.२०२३.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास), नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.०८/६४०/२०२२-२३, दि. १७.०१.२०२३.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास), नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.०८/६७८/२०२२-२३, दि. ३१.०१.२०२३.

**प्रस्तावना :-**

"राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सीमांकन" (४४०६ ००५३) या राज्य योजनेअंतर्गत सन २०२२-२३ साठी एकूण रु. ८१००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

**२.** वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये वित्तिय वर्ष सन २०२२-२३ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२२-२३ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२२ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत.

**३.** प्रस्तुत योजनेअंतर्गत सन २०२२-२३ या चालू वर्षात अर्थसंकल्पित एकूण रु. ८१००.०० लक्ष निधीतून अमरावती, नागपूर, औरंगाबाद, गडचिरोली, पुणे, कोल्हापूर व नाशिक प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) मुंबई व पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर वनवृत्तासाठी आवश्यक एकूण १८०१.०२ लक्ष निधी वितरीत करण्याबाबचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ ते ४, ६ व ७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. मागणी केलेल्या एकूण रक्कम रु.१८०१.०२ लक्ष निधी

या विभागाच्या दिनांक १३.०१.२०२३, दिनांक १.०२.२०२३ व दिनांक १०.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

४. मौजे धरणगाव, जि. जळगांव येथील गट न. १२४८/२ मधील ४.६३ हे आर क्षेत्र तसेच, गट न. १२४८/१ एकूण १.५७ हे आर क्षेत्रापैकी वन विभागाच्या ताब्यातील क्षेत्र अतिक्रमणास संवेदनशील असल्याने सदर क्षेत्रावर नव्याने अतिक्रमण होऊ नये, यासाठी सदर क्षेत्राभोवती कुंपण घालणे आवश्यक आहे. त्यासाठी आवश्यक रु. २४.४१ लक्ष एवढा निधी "राखीव वनांचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६ ००५३) लेखाशिर्षामधून उपलब्ध करुन देण्याची मागणी उप वनसंरक्षक, जळगांव यांनी दिनांक ३०.११.२०२२ अन्वये केली होती.

प्रस्तुत क्षेत्र अतिक्रमणास संवेदनशील असल्याने कुंपणे करण आवश्यक आहे. यास्तव, विशेष बाब म्हणून सदर कामासाठी आवश्यक रु. २४.४१ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे.

५. आता, या योजनेअंतर्गत सन २०२२-२३ करिता अर्थसंकल्पित असलेल्या रु. ८१००.०० लक्ष (०२ मजूरी- रु. १३७७.०० लक्ष, २७-लहान बांधकामे- रु.३७०१.०० लक्ष व ५३ मोठे बांधकामे - रु. ३०२२.०० लक्ष) निधीपैकी वित्त विभागाच्या अर्थसंकल्पिय प्रणालीप्रमाणे माहे फेब्रुवारी-२०२२ अखेर एकूण रु. ३६४९.८६ लक्ष (०२ मजूरी- रु. ८२६.२० लक्ष, २७-लहान बांधकामे- रु. १५५४.४२ लक्ष व ५३ मोठे बांधकामे -रु. १२६९.२४ लक्ष) निधी उपलब्ध आहे. त्यापैकी संदर्भ क्र. ५ अन्वये रु. १८०१.०२ लक्ष निधी वितरीत केला असून सद्य:स्थितीत शिल्लक रु. १८४८.८४ लक्ष निधीतून मौजे धरणगाव, जि. जळगांव येथील गट न. १२४८/२ मधील ४.६३ हे आर तसेच, गट न. १२४८/१ एकूण १.५७ हे आर क्षेत्रापैकी वन विभागाच्या ताब्यातील क्षेत्राभोवती कुंपण करण्यासाठी आवश्यक **रु. २४.४१ लक्ष** निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२२-२३ करिता "राखीव वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन" (४४०६ ००५३) या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध निधीच्या मर्यादेत एकूण रु. २४.४१ लक्ष इतका निधी निधीतून मौजे धरणगाव, जि. जळगांव येथील गट न. १२४८/२ मधील ४.६३ हे आर तसेच, गट न. १२४८/१ एकूण १.५७ हे आर क्षेत्रापैकी वन विभागाच्या ताब्यातील क्षेत्राभोवती कुंपण करण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.

२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही आर्थिक वर्ष २०२२-२३ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

५) सदर बांधकाम करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

६) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

७) आर्थिक वर्षा अखेर वितरीत निधी आर्णि अखर्चित निधीची पडताळणी करण्यात येवून अखर्चित निधी तातडीने शासनखाती जमा करण्यात यावा.

८) प्रस्तुत वन विभागाच्या ताब्यातील क्षेत्र संवेदनशील असल्याकारणाने सदर क्षेत्रास कुंपण घालण्यास "विशेष बाब" म्हणून शासन मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुत क्षेत्र "राखीव वने" म्हणून घोषीत करण्याच्या अनुषंगाने आवश्यक प्रस्ताव तातडीने शासनास सादर करावा. तसेच सदर क्षेत्राबाबत कार्यवाही करताना कोणत्याही न्यायालयीन आदेशाचा अवमान होणार नाही याची दक्षता घ्यावी.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२२-२३ मध्ये मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. संकिर्ण-२२/प्र.क्र.-४३/अर्थ-३, दिनांक ४.०४.२०२२ व शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०२२२१४४७४१५९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a, pseudonym=3697F9C1859177438542B4E103592744309AD950, serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04ECDFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2023.02.22 14:51:04 +05'30'

**( अपर्णा उपासनी )**
**कार्यासन अधिकारी**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) वनसंरक्षक (प्रा.), धुळे.
६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
७) उप वनसंरक्षक, जळगांव
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.